श्री ज्ञानदेवांची गणेश वंदना!

श्री माऊलींची गणेशवंदनेतील विविध पैलू आपण पाहिले. या सगळ्या पैलूंचे सर्वोच्च शिखररूप कथन जर कोणते असेल तर ते म्हणजे माऊलींची ही एकमेव ओवी-

अकार चरण युगुल

उकार उदर विशाल

मकारू महामंडल

मस्तकाकारे!

श्री गणराज प्रभूंच्या ओंकार रुपाला इतक्या सुंदर शब्दात माऊली शिवाय कोण वर्णू शकेल? सगळ्या वेद, उपनिषद पुराण शस्त्रांचा एकमेव प्रतिपाद्य विषय कोणता? तर ओंकार ब्रह्म.

अष्टादश पुराणेषु एकस्यही वै वर्णनम अर्थात अठराही पुराणात एकाचेच वर्णन आहे असे श्रीव्यासमुनी स्वत:च सांगतात. मात्र लौकिकार्थाने तसे दिसत नाही. भागवतात श्रीविष्णू तर शिवपुराणात श्रीशंकराचे वर्णन दिसते. देवी भागवत जगदंबेचे वर्णन करते तर मार्कंडेय पुराणात वेगळेच वर्णन येते. मग अठराही पुराणात एकाचेच वर्णन कसे?

तर हे सर्व देव ज्या एकटया ओंकाराचे अंश आहेत त्या ओंकाराचे वर्णन. अन्य समस्त ईश्वर महेश्वरही ओंकाराचे अंशरूपच आहेत. ओंकारच या सगळ्यांचे मुळरूप त्या ओंकाराचेच

वर्णन आहे या सगळ्या रुपात. या एकेका अंशाचे वर्णन म्हणजे त्या ओंकाराच्याच एकेका अवयवाचे, भागाचे, अंशाचे वर्णन होय.

सगळ्याच संतांनी हे परमेश्वरांचे ओंकार अंशत्व वेगवेगळ्या रुपात वर्णिले आहे.

ज्ञानदेव रचिला पाया

तुका झालासे कळस'

ही वारकरी संप्रदायाची उभारणी. या पाया पासून कळसापर्यंत सगळ्यांना हे ओंकारत्व वर्ण्य विषय वाटते. जगदगुरु तुकोबाराय सुद्धा पंचेश्वरांचे ओंकार अंशत्व सांगताना म्हणतात-

अकार तो ब्रह्मा!

उकार तो विष्णू!

मकार महेश!

मानियेला!

ऐसा तिन्ही देव

जेथुनी उत्पन्न

तो हा गजानन

वंदियेला!

अकार, उकार आणि मकार या तीन मात्रांनी ओंकार सिद्ध होतो. तुकोबाराय या तीन मात्रांना तीन परमेश्वर रुपात सांगतात. अर्थात हे तीन देव ओंकाराच्या एकेका मात्रेचे अधिकारी आहेत. पण मग सगळा ओंकार एकाच स्थानी कोण? तर माझा मोरया.

कारण माऊलींनी ओंकाराच्या या तीन मात्रांना मोरयाचे अवयव रुपात वर्णिले. अन्य परमेश्वर अंशरूप आहेत ओंकार अंशी आहे. तर ओंकार मात्रा मोरयाचे अवयव आहेत. अवयवी आहे मोरया.

या अवयवांची कथनीही मोठी सुंदर आहे. अकार चरण युगुल. अकार मात्रा ही चरण आहे. तुकोबांच्या शब्दात अकार म्हणजे ब्रह्मदेव. श्रीब्रह्मदेव हे रजोगुणाचे. चरणाचे कार्य आहे भ्रमण हा रजोगुणाचाच भाग. चंचलता हालचाल हा रजोगुणाचा स्थाईभाव. अत: निर्मितीचे अधिकारी श्रीब्रह्मदेव ज्या अकार मात्रेचे ती मात्रा मोरयाचे पाय.

उकार उदर विशाल. उकार हे मोरयाचे उदर आहे. तुकोबा उकार श्रीहरींना म्हणतात. उदराचे आणि श्रीविष्णूंचे कार्य समान आहे. श्रीविष्णूंचे कार्य आहे पालनाचे. सृष्टीचे पालन संचालन श्रीहरी करतात. शरीराच्या बाबतीत पोटचे हेच कार्य आहे. पोट सगळ्या शरीराला उर्जा पुरविते. अर्थात सगळ्या शरीराचे पालन करते. त्या उर्जेवरच शरीर चालते. अर्थात पोटाच शरीराचे संचालन करते. अत: उदर म्हणजे श्रीहरी.

तर मकारू महामंडल मकार हेच भगवान गणेशांचे मस्तक आहे. जगदगुरुंच्या भाषेत श्रीशंकर हे मकार रूप आहेत. श्रीशंकररूप मकार मोरयाचे मस्तक आहे. येथे शिव शब्दाचा वेगळा अर्थ अभिप्रेत आहे. शिव म्हणजे पवित्र. शंकर शब्दाचा अर्थच आहे. जो कल्याण करतो तो. कशाने होते कल्याण तर ज्ञानाने. अर्थात ज्ञान म्हणजेच श्रीशंकर. ते ज्ञानच भगवान श्रीगणराजांचे मुखमंडल आहे. मुख म्हणजे ओळख. आपली ओळख पटते आपल्या मुखावरूनच. तशी गणराजप्रभूंची ओळख ज्ञानाशिवाय संभवच नाही. अत: मोरयाचे मुख आहे मकार. अशा रुपात ओंकाराच्या मात्रांना श्री गणराजप्रभूंचे अवयव दाखवत जणू माऊली सुस्पष्टरीत्या हेच समीकरण मांडते की.

ओंकार = ब्रह्म = श्रीगणेश

जय गणेश!